कोविड-१९ च्या तिस-या लाटेतील प्रक्षेपित रुग्णांच्या अनुषंगाने ECRP Phase II अंतर्गत मंजूर अनुदानातून कोविड १९ च्या रुग्ण सेवेसाठी लागणारी औषधे खरेदी करण्यासाठी <u>प्रशासकीय मान्यता मिळण्याबाबत..</u>

## महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
## शासन निर्णय क्रमांकः प्रशामा-१२२१/प्र.क्र.३७/आरोग्य-७

१० वा मजला, गो. ते. रूग्णालय संकूल इमारत,
नवीन मंत्रालय, मुंबई - ४००००१.
दिनांक : १४ जानेवारी, २०२२.

**वाचा :-**

(१) अतिरिक्त अभियान संचालक, राष्ट्रीय नागरी आरोग्य अभियान, मुंबई यांचे पत्र क्र.राआसोमुं/राकाव्य/प्रशासकीय मान्यता/११५३५३/२०२२, दिनांक ११.०१.२०२२.

(२) अतिरिक्त अभियान संचालक, राष्ट्रीय नागरी आरोग्य अभियान, मुंबई यांचे पत्र क्र.राआसोमुं/राकाव्य/प्रशासकीय मान्यता/६६५३५४/२०२२, दिनांक ११.०१.२०२२.

(३) अतिरिक्त अभियान संचालक, राष्ट्रीय नागरी आरोग्य अभियान, मुंबई यांचे पत्र क्र.राआसोमुं/प्रशासकीय मान्यता/११६९१०/२०२२, दिनांक १२.०१.२०२२.

(४) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग क्र.प्रशामा-१२२१/प्र.क्र.१४२/आरोग्य-८, दिनांक २३.०८.२०२१.

(५) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग क्र.प्रशामा-१२२१/प्र.क्र.१४२/आरोग्य-८, दिनांक ०१.११.२०२१.

**प्रस्तावना:-**

आरोग्य सेवा आयुक्तालयाकडून प्राप्त प्रस्तावाच्या अनुषंगाने साथरोग नियंत्रण कार्यक्रम (लेखाशीर्ष २२१०४२८६) अंतर्गत सन २०२१-२२ च्या मंजूर अनुदानातून कोविड १९ ची संभाव्य लाट विचारात घेऊन उपचारात्मक व प्रतिबंधात्मक उपाययोजनाकरीता औषधे व औषधी साहित्य खरेदी करण्यास संदर्भ क्र.४ व ५ अन्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती. आता, संदर्भ क्र. २ व ३ अन्वये प्रस्तावित केल्यानुसार सदर शासन निर्णयामधील काही बाबी वगळून त्याऐवजी ECRP Phase II अंतर्गत मंजूर अनुदानातून ही औषधी व औषधी साहित्य खरेदी करण्यास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

आरोग्य सेवा आयुक्तालयाकडील प्रस्तावाच्या अनुषंगाने साथरोग नियंत्रण कार्यक्रम (लेखाशीर्ष २२१०४२८६) अंतर्गत सन २०२१-२२ च्या मंजूर अनुदानातून संदर्भ क्र.४ व ५ अन्वये दिलेल्या प्रशासकीय

मान्यतेमधून वगळून सदर औषधे व औषधी साहित्य केंद्र शासनाने ECRP-II अंतर्गत राज्याकरीता कोविड-१९ अंतर्गत वितरीत केलेल्या निधीमधून रुग्ण सेवेसाठी लागणाऱ्या औषधांची अत्यावश्यकता लक्षात घेऊन खालील तक्त्यात नमूद केल्याप्रमाणे औषधे खरेदीसाठीच्या प्रस्तावास अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे :-

| Sr.No | Item (Kit/ Medicine) | Quantity | Rate (In Rs.) | Amount (In Lakhs) |
|---|---|---|---|---|
| 1 | RTPCR Test Kit (VTM सह) | 1,25,00,000 | 28.825/- | 3603.125 |
| 2 | Rapid Antigen Test Kit | 87,50,000 | 13.34/- | 1167.25 |
| 3 | Inj. Enoxaparin (LMVH) 0.6 IU | 5,54,000 | 131.25/- | 727.125 |
| 4 | IvIg Injection | 25,000 | 8400/- | 2100.00 |
| | **Total** | | | **7597.50** |

**अटी व शर्ती** :-

१) सदर औषधांची खरेदीची आवश्यकता / मागणी याची शहानिशा / खातरजमा करण्यात यावी. त्यानंतरच सदर बाबींच्या खरेदीसाठी निविदा प्रक्रिया राबविण्यात यावी.

२) सदरहू औषधांची खरेदी विनिर्देश गरजेनुसार व अद्ययावत असल्याची खातरजमा करण्यात यावी. खरेदी करावयाच्या बाबींचे तांत्रिक विनिर्देश (Technical specification) संबंधित तज्ज्ञांनी (तांत्रिक समिती / अधिकारी) यांनी मान्य केलेल्या विनिर्देशानुसार असावेत. तसेच, सदर तांत्रिक विनिर्देश (Technical specification) हे कोणत्याही विशिष्ट कंपनीला फायदा होईल अशा रितीने तयार केलेले नसल्याबाबत खातरजमा करण्यात यावी. पीआयपी मध्ये मंजूर असलेल्या बाबींच्या तांत्रिक विर्निदेशानुसार मागणीपत्र पाठविण्याची जबाबदारी संबंधीत कार्यक्रम प्रमुखांची राहिल. प्रस्तावातील समाविष्ट असलेल्या बाबींचीच खरेदी करण्यात यावी.

३) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्र. भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/ उद्योग-४, दिनांक १ डिसेंबर, २०१६ अन्वये प्रसिध्द करण्यात आलेल्या शासकीय विभागांनी करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठीच्या कार्यपध्दतीची सुधारीत नियमपुस्तिका यामधील तरतूदीनुसार विहित खरेदी प्रक्रिया राबविण्यात यावी.

४) प्रशासकीय मान्यता देताना प्रस्तावित खरेदीचे दर हे अंदाजित आहेत, त्यामुळे GEM Portal, इतर राज्यांचे दरकरार, National Pharmaceutical Pricing Authority NPPA). National Medical Devices Authority (NDMA) यांच्याकडील उपलब्ध असलेल्या न्युनतम दर विचारात घेण्यात यावेत. तसेच हाफकिन संस्थेतील सदर बाबींची खरेदी केली जात असल्यास अथवा झालेली असल्यास निविदेत प्राप्त झालेले न्युनतम दर निविदेकरीता मागणी नोंदवितांना औषधी, औषधी साहित्य व उपकरणांच्या संदर्भात अंदाजित दर म्हणून नोंदविण्यात यावेत व खरेदी प्रक्रियेअंती दर निश्चित करण्यात यावा. सदर दर हा बाजार भावापेक्षा कमी असल्याबाबत आणि

संबंधित पुरवठादाराने या बाबीचा इतर ठिकाणी ज्या दराने पुरवठा केला आहे. त्या दरापेक्षा जास्त नसल्याबाबत खातरजमा करण्यात यावी.

५) खरेदी करण्यात येणाऱ्या बाबींची पुरवठापूर्व / पुरवठानंतर नमुना तपासणी (pre/Post dispatch random sample inspection) करुन उचित व योग्य विनिर्देश (specification) असलेल्या वस्तुंचीच खरेदी करण्यात येईल, याची खात्री करण्यात यावी.

६) खरेदी करण्यात येणाऱ्या बाबींचा पुरवठा झाल्यानंतर त्यांची साठवणूक व वितरण (storage & distribution) करणे तसेच, पुरवठा साखळी व्यवस्थापन (Supply chain management) आणि वस्तुसूची व्यवस्थापन (Inventory Management) योग्य पध्दतीने करुन सदर बाबी विनावापर पडून राहणार नाहीत व त्यांचा विहीत मुदतीत वापर होईल, याची दक्षता घेण्यात यावी.

७) सदरहू खरेदीसाठी होणारा खर्च हा ECRP Phase II अंतर्गत FMR Code S.१.१ व FMR Code S.१.३ अंतर्गत मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा. सदरची खरेदी प्रशासकीय मंजुरीच्या विहित कालावधीत पूर्ण होईल याची दक्षता घ्यावी.

८) तसेच, या बाबींच्या खरेदी द्विरुक्ती (Duplication) होणार नाही, याची दक्षता घेण्यात यावी.

९) संपूर्ण खरेदी प्रक्रिया राबविताना केंद्रिय दक्षता आयोगाच्या मार्गदर्शक सूचनांचे (CVC Guidelines) तंतोतंत पालन करण्यात यावे.

१०) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/भाग-२/२०१३/विनियम, दिनांक १७ एप्रिल, २०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला उपविभाग-दोन मधील अ.क्र.४ नियम क्र.७ समोरील स्तंभ क्र.६ येथील अटींची पूर्तता करण्यात यावी.

११) खरेदी प्रक्रिया पूर्ण झाल्यानंतर खरेदी समितीच्या मान्यतेनंतरच पुरवठा आदेश निर्गमित करण्यात यावेत.सदर प्रकरणी सार्वजनिक आरोग्य विभाग शासन निर्णय क्र.खरेदी - २०१६/प्र.क.२४०/आरोग्य-८ दिनांक २६ जुलै,२०१७ च्या शासन निर्णयातील तरतूदीनुसार कार्यवाही करण्यात यावी.

०२. उपरोक्त अनुक्रमांक १ ते ११ येथे नमूद अटींची पूर्तता करण्याची व खरेदी नियमानुसार व आवश्यकते प्रमाणे आहे हे सुनिश्चित करण्याची संपूर्ण जबाबदारी आयुक्त (आरोग्य सेवा) तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई, आणि अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा, राज्य कुटुंब कल्याण कार्यालय, पुणे यांची राहील.

०३. शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम, भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५ मधील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग-पहिला उपविभाग-दोन मधील अनु क्रमांक ४, नियम क्र. ७ अन्वये प्रशासनिक विभागास पूर्ण अधिकार प्रदान करण्यात आले आहेत, त्यानुसार सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

०४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०१०७१३३८२५५०१७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

LAHANE VIJAYKUMAR LAXMANRAO

Digitally signed by LAHANE VIJAYKUMAR LAXMANRAO
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PLANNING DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=047af7706d4845170e3864b62c8bc6b380c78f11ce6607746c0b15e934fc8284, pseudonym=91CF303CCF98AAFBC28FD87C6A71DA717A6A7250, serialNumber=8902AEDC74F3CACF3FB967FF5955AAF5DCBFDD2C053872C04B5E4671EF77EC30, cn=LAHANE VIJAYKUMAR LAXMANRAO
Date: 2022.01.14 17:46:29 +05'30'

**( वि. ल. लहाने )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१) आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
२) अतिरिक्त अभियान संचालक, राष्ट्रीय नागरी आरोग्य अभियान, मुंबई.
३) संचालक (वित्त व लेखा), राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
४) संचालक १ व २, आरोग्य सेवा, मुंबई व पुणे.
५) अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा, राज्य कुटुंब कल्याण कार्यालय, पुणे.
६) सहसंचालक, आरोग्य सेवा (खरेदी कक्ष), मुंबई
७) सर्व सह संचालक (आरोग्य सेवा संचालनालया मार्फत)
८) सर्व सहसचिव/उपसचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग.
९) उप संचालक, सर्व मंडळ कार्यालये.
१०) सर्व जिल्हा शल्य चिकित्सक (FWB मार्फत)
११) सर्व जिल्हा आरोग्य अधिकारी (FWB मार्फत)
१२) अवर सचिव (आरोग्य-८), सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३) निवडनस्ती (आरोग्य-७)